**महाराष्ट्र शासन**

क्रमांक — संकीर्ण-१०१४ /प्र.क्र.६३/११
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दुरध्वनी क्र. २२०२ ३१२१
दिनांक-२७ ऑगस्ट, २०१४

**संदर्भ :-** शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-२००४/प्र.क्र.१५/०४/१२, दिनांक २५ मे, २००६

## कार्यालयीन आदेश

संदर्भाधीन शासन अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ प्रसारित करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९ (१) व (२) अंतर्गत प्रत्येक विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांनी त्यांना दुय्यम असलेल्या अधिकाऱ्यास अंतिम निर्णय घेण्यासाठी शक्ती प्रदान करावयाच्या आहेत. तसेच विभागाशी/ कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाच्या कार्यासन — ११ च्या अखत्यारितील विषयांच्या बाबतीत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. मात्र, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे या स्तरांमध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१४०८२८११०६४८६६०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAT VENKATESH MADHAV

Digitally signed by BHAT VENKATESH MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMIN DEPT,CID - 916890, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6e277c9088a4cb8b53e535a4642a6800b908c5dbdb3a63175760874eba717ae1, cn=BHAT VENKATESH MADHAV
Date: 2014.08.28 11:23:45 +05'30'

(व्यं.मा.भट)

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) प्रधान सचिव (सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
२) उप सचिव/अवर सचिव /कक्ष अधिकारी / का.क्र.११,
३) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/ का.क्र. १८ (र. व का.), का. क्र.१९-अ,
४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
५) निवडनस्ती

संकीर्ण-१०१४/प्र.क्र.६३/११, दिनांक २७ ऑगस्ट, २०१४ सोबतचे विवरणपत्र

| अ. क्र. | विभागाकडून/ कार्यालयाकडून पुरविली जाणारी सेवा | अधिकारांचे प्रत्यायोजन | सादरीकरणाचे तीन स्तर | | | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | पहिला स्तर | दुसरा स्तर | तिसरा स्तर | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ व महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ तसेच विभागीय चौकशी नियमपुस्तिका यात सुधारणा करण्यासंबंधीची प्रकरणे | धोरणात्मक बाबी, शासन परिपत्रके, आदेश निर्गमित करणे/ अधिसूचना काढणे | अवर सचिव | उप सचिव | अ.मु.स./ प्र.स./ सचिव (सेवा) मुख्य सचिव | सादरीकरणाचे दर्शविल्याप्रमाणे तीन स्तर असले तरी वरिष्ठ अधिका-यांचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यांमध्ये योग्य तो बदल करण्यात येईल. |
| २ | महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ व महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ अंतर्गत येणाऱ्या सर्वसाधारण बाबी व अर्थान्वयन | माहिती पुरविणे व नियम/ आदेशांचे अर्थान्वयन | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव/ अ.मु.स./ प्र.स./ सचिव (सेवा) | |
| ३ | १) गट- अ मधील अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई सुरू करण्यासंबंधीच्या प्रस्तावांना तसेच त्यांच्या शिक्षेसंबंधीच्या प्रस्तावांना सहमती देणे | १)अपचारी अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या असुधारित वेतनश्रेणीतील किमान टप्पा रु. १०६५० पेक्षा कमी असलेल्या प्रकरणी मार्गदर्शन/ सहमती | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव | |
| | | २) वरील १ व्यतिरिक्त अन्य प्रकरणी मार्गदर्शन /सहमती | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव | अ.मु.स./ प्र.स./ सचिव (सेवा) | |
| | २) गट- ब मधील अधिकाऱ्यांना वसुलीची शिक्षा किंवा जबर शिक्षा देण्यासंबंधीच्या प्रस्तावांना सहमती | मार्गदर्शन/सहमती | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव /सह सचिव | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ च्या नियम २६, २७, १०० व १०१ खालील वैयक्तिक प्रकरणे | १)अपचारी अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या असुधारित वेतनश्रेणीतील किमान टप्पा रु. १०६५० पेक्षा कमी असलेल्या प्रकरणी मार्गदर्शन/ सहमती | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव | |
| | | २) वरील १ व्यतिरिक्त अन्य प्रकरणी मार्गदर्शन /सहमती | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव | अ.मु.स./ प्र.स./ सचिव (सेवा) | |
| ५ | महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ७०, ७१ व ७२ खालील वैयक्तिक प्रकरणे | अशा प्रस्तावावर मार्गदर्शन/अभिप्राय/सहमती | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव | |
| ६ | मुंबई नागरी सेवा नियम ५३६ खालील प्रकरणे | सहमती/ मार्गदर्शन/ सल्ला/अभिप्राय | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव | |
| ७ | १) अखिल भारतीय सेवेतील, राज्यसेवेतील तसेच सार्वजनिक उपक्रम, मंडळे, महामंडळे इत्यादींचे अधिकारी/ पदाधिकारी यांच्या विदेश दौऱ्यासंबंधी धोरणात्मक बाबी | शासन परिपत्रक /आदेश निर्गमित करणे | अवर सचिव | उप सचिव | अ.मु.स./ प्र.स./ सचिव (सेवा) मुख्य सचिव | |
| | २) वैयक्तिक प्रकरणी विदेश दौऱ्याचे प्रस्ताव शिफारस समितीपुढे ठेवणे | अ) अशा प्रकरणी मार्गदर्शन/ सल्ला | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव/ सह सचिव | |
| | | ब) शिफारस समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे. | अवर सचिव | उप सचिव | अ.मु.स./ प्र.स./ सचिव (सेवा) मुख्य सचिव | |